सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था,
औरंगाबाद या कार्यालयातील ५
अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्यासाठी
मान्यता देण्याबाबत-

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. एसपीआय-२०१८/प्र.क्र.४०९/का.२८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ०८/१०/२०१८.

वाचा: १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र : एसपीआय २००३/५४६/प्र.क्र.१०६/ २००३/२८, दिनांक ०६/०८/२००४.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग,क्र.एसपीआय-२०१३/,(प्र.क्र.४६०/१३)/२८ दिनांक १२/०२/२०१५.
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १०/०२/२०१७.
४) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक.पदनि२०१६/प्र.क्र.०८/१६/आपुक दिनांक ०८/०१/२०१८.
५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग,एसपीआय-२०१८/प्र.क्र.१४३/का.२८ दिनांक २३/०३/२०१८
६) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक.पदनि २०१६/प्र.क्र.०८/१६/आपुक दिनांक ०७/०९/२०१८.

**प्रस्तावना:-**

सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद या कार्यालयातील ५ अस्थायी पदांना संदर्भाधीन शासन निर्णय क्र. एसपीआय-२०१८/ प्र.क्र.१४३/ का.२८, दिनांक २३/०३/२०१८ अन्वये दिनांक ०१/०३/२०१८ ते दिनांक ३०/०९/२०१८ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मंजूरी देण्यात आली होती. आता वित्त विभागाच्या दिनांक ०७/०९/२०१८ च्या शासन निर्णयान्वये अस्थायी पदांना दिनांक ०१/१०/२०१८ ते दिनांक २८/०२/२०१९ पर्यंत चालू ठेवण्यास प्रशासकीय विभागांना मंजूरी देण्यात आली आहे.

**शासन निर्णय-**

संचालक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद यांनी त्यांच्या दिनांक १०/०९/२०१८ च्या पत्रान्वये सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद या कार्यालयाच्या आस्थापनेवरील एकूण ५ अस्थायी पदे सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त नाहीत व ती पदे यापुढेही चालू ठेवणे आवश्यक असल्याचे प्रस्तावित केल्यानुसार सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद या कार्यालयाच्या आस्थापनेवरील खालील एकूण ५ अस्थायी पदे दिनांक ०१/१०/२०१८ ते दिनांक २८/०२/२०१९ या ५ महिन्याच्या कालावधीत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम व वेतन श्रेणी | संख्या | विभागाच्या शासन निर्णयांचा क्रमांक व दिनांक |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १ | लिपीक -नि-टंकलेखक<br>पीबी-१, रु.५२००-२०२००,<br>(ग्रेड वेतन रु.१९००/-) | १ | एसपीआय-११७७/२४९१-XX-A<br>दि.११/०७/७८ |
| २ | शिपाई-१<br>एस, रु.४४४०-७४४०,<br>(ग्रेड वेतन रु.१३००/-) | १ | एसपीआय-१४७६/१८/२०-अ ,<br>दि. ०५/०४/७७ |

| | | | |
|---|---|---|---|
| ३ | पहारेकरी- १<br>एस, रु.४४४०-७४४०,<br>(ग्रेड वेतन रु.१३००/-) | १ | एसपीआय-१०८४/४५६३/१४/८५/२८,<br>दि.२०/०५/८५. |
| ४ | स्वयंपाकी-१<br>एस, रु.४४४०-७४४०,<br>(ग्रेड वेतन रु.१३००/-) | १ | संसैस-१०९०/प्र.क्र०७/९०/२८,<br>दि. ०१/०९/९० |
| ५ | सफाईगार-१<br>एस ४४४०-७४४०,<br>(ग्रेड वेतन रु.१३००/-) | १ | एसपीआय-१०८४/४५६३/१४/८५/२८,<br>दि.२०/०५/८५. |
| | **एकूण पदे** | **५** | |

०३. यासाठी होणारा खर्च " मागणी क्रमांक-- ए-५, लेखाशीर्ष २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०- इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, २००- इतर कार्यक्रम (००) (०५) सेवा पूर्वाध्ययन संस्था (२२३५ ००७१) योजनेत्तर", या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०१८ -२०१९ या वित्तीय वर्षासाठी मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

०४. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दिनांक ०७/०९/२०१८ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१८१०१११३०७५२५२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Suresh Mahadeo Khade

Digitally signed by Suresh Mahadeo Khade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=14c299447f4a6e6c33ab3f7a85fbf010628981e82f8311a81d1cf974681485c2, serialNumber=f0b4c833a6fc7c6fb7cb0a96a3e2bb79d42d283b8f0f7bfc1ae95298d60bacf1, cn=Suresh Mahadeo Khade
Date: 2018.10.11 13:10:23 +05'30'

**( सु.म.खाडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१) संचालक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, सिडको एन-१२, सेक्टर-३, मौलाना आझाद कॉलेजच्या मागे, नवीन औरंगाबाद - ४३१००३,
२) महालेखापाल (लेखा व परीक्षा) - १/२, महाराष्ट्र ( मुंबई / नागपूर),
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- १/२, महाराष्ट्र (मुंबई / नागपूर),
४) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, औरंगाबाद,
५) सामान्य प्रशासन विभाग (कार्या-२५), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
६) निवड नस्ती (२ प्रती).